राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान (RGSA)
योजनेअंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय
वर्षाकरिता केंद्र शासनाकडून केंद्र हिश्श्याच्या
दुसऱ्या हप्त्याचा पहिला भाग म्हणून प्राप्त
झालेला निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः राग्रास्व- २०२१ /प्र. क्र. ८४ /आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२

वाचा :-

१. शासन निर्णय क्रमांकः राग्रास्व- २०१८ /प्र.क्र.१०२ (भाग-२)/आस्था-१५, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९.
२. शासन निर्णय क्रमांक रागांपं- २०१६ /प्र.क्र. १३६/आस्था-१५ (यो-४), दि. ५ मार्च, २०१९.
३. शासन निर्णय क्रमांक राग्रास्व २०२१/प्र.क्र.५८/आस्था १५, दिनांक २९ सप्टेंबर, २०२१.
४. पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांची क्र. के-११०११/१३/२०२१-सीबी, दि. ०८ नोव्हेंबर, २०२१ ची २ पत्रे.
५. शासन निर्णय क्रमांक राग्रास्व २०२१/प्र.क्र.८४/आस्था १५, दिनांक २६ नोव्हेंबर, २०२१ ( केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा)
६.पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांची क्र. के-११०११/१३/२०२१-सीबी, दि. १६ डिसेंबर, २०२१ ची ४ पत्रे.
७. शासन निर्णय क्रमांक राग्रास्व २०२१/प्र.क्र.८४/आस्था १५, दिनांक ०५ जानेवारी, २०२२ ( केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा)
८. पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांची क्र. के-११०११/१३/२०२१-सीबी, दि.२५ मार्च, २०२२ ची ३ पत्रे व दिनांक २८ मार्च, २०२२ ची २ पत्रे.

## प्रस्तावना :-

केंद्र शासनाने पंचायती राज व्यवस्थेच्या बळकटीकरणासाठी केंद्र शासनाच्या **"राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान"** या योजनेचे पुनर्गठन करुन **" राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान"** ही योजना सन २०१८-१९ पासून लागू केली आहे . सदर योजना केंद्र शासन पुरस्कृत असून या योजनेच्या निधीचे प्रमाण हे केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे आहे. **राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान** (Rastriya Gram Swaraj Abhiyan) **ही केंद्र पुरस्कृत योजना दिनांक १ एप्रिल, २०१८ पासून कार्यान्वित करण्यात आली आहे.** सदरची केंद्र पुरस्कृत **राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान** (Rastriya Gram Swaraj Abhiyan) ही योजना या विभागाच्या क्रमांक राग्रास्व- २०१८ /प्र.क्र.१०२ (भाग-२)/आस्था-१५, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये राज्यात राबविण्याचा निर्णय घेतला आहे.

२. राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियानाच्या सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता रु. २२२.७९ लक्ष (रुपये दोनशे बावीस कोटी एकोणऐंशी लक्ष फक्त) वार्षिक कृती आराखड्यास केंद्र शासनाने मंजूरी दिलेली आहे. त्या अनुषंगाने पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांच्या दिनांक ०८ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान अंतर्गत राज्यास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी पहिल्या हप्त्याचा पहिला भाग म्हणून रु. ५२८.८ लक्ष ( रुपये पाच कोटी अठ्ठावीस लक्ष ऐंशी हजार फक्त) इतका निधी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये राज्यास प्राप्त झाला होता. तसेच सदर निधी संदर्भ क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये ( केंद्र हिस्सा) वितरित करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्रमांक ६ अन्वये पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांच्या दिनांक १६ डिसेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान अंतर्गत राज्यास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी पहिल्या हप्त्याचा दुसरा भाग म्हणून ३३४१.८५ लक्ष ( रुपये तेहतीस कोटी एकेचाळीस लक्ष पंच्याऐंशी हजार फक्त) इतका निधी राज्यास प्राप्त झाला होता. तसेच सदर निधी संदर्भ क्रमांक ७ च्या शासन निर्णयान्वये ( केंद्र हिस्सा) वितरित करण्यात आला आहे.

३. आता सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता केंद्र शासनाच्या संदर्भ ८ येथील क्रमांक k-11011/13/2021-CB, दिनांक २५ मार्च, २०२२ व दि. २८ मार्च २०२२ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान अंतर्गत राज्यास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी रु. ११५४.९८ लक्ष ( रुपये अकरा कोटी चोपन्न लक्ष अठ्याण्णव हजार फक्त) ) Non SC/ST (General) साठी, रु. ३३५.०२ लक्ष ( रुपये तीन कोटी पस्तीस लक्ष दोन हजार फक्त) SC/SP (Capital) साठी, रु. ३००.७५ लक्ष (रुपये तीन कोटी पंच्याहत्तर हजार फक्त) SC/SP (Capital) साठी, रु. ८१६.४० लक्ष (रुपये आट कोटी सोळा लक्ष चाळीस हजार फक्त) Non SC/ST (General) साठी, आणि रु. ८५६.५५ लक्ष (रुपये आठ कोटी छपन्न लक्ष पंचावन्न हजार फक्त) Non SC/ST (General) साठी असा एकूण रु. ३४६३.७० लक्ष ( रुपये चौतीस कोटी त्रेसष्ट लक्ष सत्तर हजार फक्त) इतका निधी राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान अंतर्गत राज्यास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांजकडून दुसऱ्या हप्त्याचा पहिला भाग म्हणून ६०% केंद्र हिश्श्यापोटी प्राप्त झालेला आहे. सदर निधी B.D.S. वर उपलब्ध करुन State Nodal Officer, राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान (RGSA) (६०: ४०) या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी केंद्र हिश्श्याच्या दुसऱ्या हप्त्याचा पहिला भाग म्हणून रु. ३४६३.७० लक्ष ( रुपये चौतीस कोटी त्रेसष्ट लक्ष सत्तर हजार फक्त) इतका निधी [ रु. ११५४.९८ लक्ष ( रुपये अकरा कोटी चोपन्न लक्ष अठ्याण्णव हजार फक्त) ) Non SC/ST (General) करीता, रु. ३३५.०२ लक्ष ( रुपये तीन कोटी पस्तीस लक्ष दोन हजार फक्त) SC/SP (Capital) करीता, रु. ३००.७५ लक्ष (रुपये तीन कोटी पंच्याहत्तर हजार फक्त) SC/SP (Capital) करीता, रु. ८१६.४० लक्ष (रुपये आट कोटी सोळा लक्ष चाळीस हजार फक्त) Non SC/ST (General) करीता, आणि रु. ८५६.५५ लक्ष (रुपये आठ कोटी छपन्न लक्ष पंचावन्न हजार फक्त) Non SC/ST (General) करीता ] याप्रमाणे State

Nodal Officer राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना वितरित करावयाचा निधी विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. उप आयुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. उप आयुक्त (आस्थापना) यांनी संबंधित State Nodal Officer राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना अनुदान वितरित करावे. State Nodal Officer राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांनी जिल्हा परिषदांना सदर निधी मंजूर वार्षिक कृती आराखडयाप्रमाणे वितरित करावा.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च अत्यंत काटकसरीने केला जाईल याबाबत राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांनी व सर्व मुख्य कार्यकारी जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना या योजनेसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार व उक्त संदर्भ क्रमांक ८ येथील केंद्र शासनाच्या पत्रातील सूचनांनुसार संबंधितांना वितरित करावा आणि वितरित केलेल्या निधीचा उपयोग योग्य प्रकारे होतो किंवा नाही याबाबत खातरजमा करुन घ्यावी . त्याचप्रमाणे होणाऱ्या खर्चावर नियंत्रण ठेवणे आणि निश्चित केलेली उद्दिष्टे, झालेली साध्ये यावरील झालेल्या खर्चाचा आढावा घेऊन शासनास तात्काळ अहवाल पाठवावा. तसेच खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र देखील सादर करावे.

४. या अनुदानातून State Nodal Officer राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांनी केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासणीचे अधिकार महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई आणि महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर यांना राहतील व त्यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित संस्था / कार्यालय संपूर्ण मदत/ सहकार्य करावे.

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर केलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्र .एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, ०९३ जिल्हा आस्थापना राज्य क्षेत्र,(०६) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्यांना प्रशिक्षण, (०६)(०६) राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, (केंद्र हिस्सा ६०%), लेखाशिर्ष क्र. २०५३A११७, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ मध्ये मंजूर असलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग १ ते ५ मधील तरतुदीनुसार शासन निर्णय दिनांक १५.०४.२०१५ सोबतच्या उपविभाग ३ मधील अ.क्र.४ परि.२७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ३ फेब्रुवारी , २०२२ मधील सूचनांना अनुलक्षून तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३११/व्यय १५, दिनांक ३१.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०१२५९३५१३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: cn=SUNIL SURYAKANT HANJE, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=usyoj4.rdd-mh@nic.in, c=IN
Date: 2022.03.31 15:29:27 +05'30'

( सुनिल हंजे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता महाराष्ट्र विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन मुंबई.
६. मा.विधान सभा/ मा.विधान परिषद सदस्य (सर्व)
७. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
८. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव
९. मा.अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक
१०.मा.अप्पर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक
११.मा.प्रधान सचिव (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक
१२.मा.प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहायक
१३.मा. प्रधान सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे स्वीय सहायक
१४.मा.प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान) यांचे स्वीय सहायक
१५.विभागीय आयुक्त (सर्व)
१६.महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), बाणेर रोड, पुणे
१७.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८.उप सचिव(सर्व) ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
१९.वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७) मंत्रालय, मुंबई-३२
२०. नियोजन विभाग (का.क्र.१४४४), मंत्रालय, मुंबई-३२.
२१. कार्यासन (वित्त-१), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
२२. निवडनस्ती-आस्था-१५